GR-200404151258 21001-0100

सेवाप्रवेश नियम--------

संगणक हाताळणी/वापराबाबतचे ज्ञान अर्हतेची सेवाप्रवेश नियमात तरतुद करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्र.एसआरव्ही-२००२/१२२०/१२,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २७ नोव्हेंबर, २००२.

पहा :-(१) शासन अधिसूचना,सामान्य प्रशासन विभाग,क्र.सेप्रनि-१०९८/ प्र.क्र.७/९८/१२, दि.२५/१/१९९९.

(२) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,क्र.प्रशिक्षण-२०००/ प्र.क्र.५/२००१/३९, दिनांक २० जुलै,२००२.

परिपत्रक :

शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकःसेप्रनि-१०९८/प्र.क्र.७/९८/१२, दिनांक २५/१/१९९९ आणि शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकःप्रशिक्षण-२०००/ प्र.क्र.५/२००१/३९, दिनांक २० जुलै,२००२ अन्वये राज्य शासनाच्या विविध सेवामधील गट 'अ','ब' व 'क' संवर्गातील पदावरील नियुक्तीसाठी एक अर्हता म्हणून संगणक हाताळणी/वापराबाबतचे ज्ञान अत्यावश्यक ठरविण्यात आले आहे. त्यामुळे यापुढे सेवाप्रवेश नियमात सुधारणा करताना किंवा नव्याने सेवाप्रवेश नियम विहित करताना संगणक ज्ञानासंबंधीच्या अटीची तरतुद करण्यात यावी अशी सूचना महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने केली आहे.

२. सदर सूचना विचारात घेऊन शासन असे आदेश देत आहे की, सर्व मंत्रालयीन विभागानी त्यांच्या अधिपत्याखालील गट 'अ','ब' आणि 'क' पदांच्या सेवाप्रवेश नियमात यापुढे सुधारणा करताना किंवा नव्याने सेवाप्रवेश नियम विहीत करताना त्यामध्ये खालीलप्रमाणे तरतुद करण्यात यावी.

"Person appointed to the post mentioned in Rule--should posses a certificate in computer opration prescribed by the Directorate of Information Technology Govt. of Maharastra from time to time".

३. सद्यःस्थितीत माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने नियुक्तीसाठी संगणक अर्हतासंबंधीच्या किमान अर्हता खालीलप्रमाणे विहित केलेल्या आहेत.

(P.T.O.

"Certificate of D.O.E.A.C.Societies "C.C.C." or "O" level or "A" level or "B" level or "C" level or MS-CIT or GECT Certificate of Maharashtra State Higher & Technical Education Board".

त्यामुळे पदांसाठी मागणीपत्र पाठवितांना नियुक्ती अधिकाऱ्यांनी उपरोक्त संगणक अर्हता किमान अर्हता म्हणून जाहिरातीत अधिसूचित कराव्यात.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

का.का.नारायणकर
अवर सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव,
मंत्रालयीन विभागांचे सर्व अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग,
वित्त विभाग/सेवा-३,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
* प्रबंधक, लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा),मुंबई.
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधान परिषद), मुंबई,
* सचिव, राज्य निवडणूक आयोग,नवीन प्रशासकीय भवन,मंत्रालय,मुंबई,
* महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र मुंबई,
* महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र नागपूर,
* महालेखापाल-१ (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र मुंबई,
* महालेखापाल-२ (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक (निवासी लेखे) कोकण भवन, नवी मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
मंत्रालयीन विभागाच्या अखत्यारीतील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती

* पत्राने

**********

H-953(4000-11-02)1a.